जिल्हा प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटीच्या व्यवस्थापकीय समितीवर अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्याबाबत.
जिल्हा : कोल्हापूर.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक- पविआ-१०१९/प्र.क्र.१३/पदुम-३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- १७ जानेवारी, २०१९.

वाचा :- (१) कृषि व पदुम विभाग, अधिसूचना क्र. पविआ-२०१४/प्र.क्र.४१४/पदुम-३, दिनांक १४.०३.२०१७
(२) अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन यांचे कार्यालयीन पत्र क्र. एसएलटी / कायदे / २८३/१६२४१-४४/ २०१८/पसं-१२, औंध, पुणे-६७, दि. ०५.१२.२०१८.
(३) जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, कोल्हापूर तथा सदस्य सचिव, प्राणी क्लेष प्रतिबंधक समिती, कोल्हापूर यांचे क्र. जिपउको/तां./प्राणीक्लेश/४१४१-४२/२०१८, दिनांक २६.१०.२०१८.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या प्राणी क्लेष प्रतिबंधक अधिनियम, १९६० मधील तरतुदींची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी राज्यातील प्रत्येक जिल्हयामध्ये प्राणी क्लेष प्रतिबंधक (प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटी स्थापना व नियमन) नियम, २००१ च्या नियम ३ मधील तरतुदीनुसार संदर्भाधीन दिनांक १४ मार्च, २०१७ च्या अधिसूचनेन्वये सर्व जिल्ह्यांमध्ये प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटीच्या व्यवस्थापकीय समित्यांची स्थापना करण्यात आली आहे. सदर व्यवस्थापकीय समितीवर गोशाळा/पांजरापोळ संस्थेचे अध्यक्ष, प्राणी विषयक कार्य करणारे सेवाभावी संस्थेचे सदस्य, सर्वसाधारण समितीने नामनिर्देशीत केलेल्या व्यक्ती आणि मानवहीत कार्य करणारे/ प्राण्यावर प्रेम करणाऱ्या व्यक्ती इ. क्षेत्रात कार्य करणाऱ्या जास्तीत जास्त १२ व्यक्तींची अशासकीय सदस्य म्हणून नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, कोल्हापूर तथा सदस्य सचिव, प्राणी क्लेष प्रतिबंधक समिती, कोल्हापूर यांच्याकडून प्राप्त झालेला प्रस्ताव विचारात घेवून सदर्भाधीन दिनांक १४/०३/२०१७ अधिसूचनेतील खंड (क) (३) येथील तरतूदीनुसार कोल्हापूर जिल्ह्यातील प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटीच्या व्यवस्थापन समितीवर खालील व्यक्तींची अशासकीय सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. सदर अशासकीय सदस्य पदाचा कार्यकाळ नियुक्तीच्या दिनांकापासून तीन वर्षे राहील.

| **अ.क्र.** | **अशासकीय सदस्याचे नांव** | **क्षेत्राचे नांव** | **पदनाम** |
|---|---|---|---|
| १ | श्री. वसंत माणेकलाल शहा,<br>माणेक, ५४१ ई वॉर्ड, व्यापारी पेठ, शाहुपुरी, कोल्हापूर | संबंधित जिल्ह्यातील गोशाळा/पांजरपोळ संस्थांपैकी एका संस्थेचा अध्यक्ष. | अशासकीय सदस्य |
| २ | डॉ. चंद्रहास राजाराम कापडी<br>संस्कृती पूर्व इमारत, फ्लॅट नं.९, १३ वी गल्ली, राजारामपुरी, कोल्हापूर | प्राणी कल्याणविषयक कार्य करणाऱ्या सेवाभावी संस्थांचे दोन सदस्य. | अशासकीय सदस्य |
| ३ | श्रीमती कल्पना पुरुषोत्तम भाटिया<br>६८५, ई वॉर्ड, दुसरी गल्ली, शाहूपुरी, कोल्हापूर. | | |
| ४ | श्रीमती अश्विनी संग्रामसिंह रावराणे<br>शितल, २८, सरनाईक माळ, सम्राटनगर, कोल्हापूर | सर्वसाधारण समितीने नामनिर्देशित केलेल्या दोन व्यक्ती | अशासकीय सदस्य |
| ५ | श्रीमती दाक्षायणी विश्वास जाधव<br>प्लाट क्र.२८, ग्रेस कळंबा रोड, साळोखेनगर, कोल्हापूर | | |
| ६ | श्री. किशोरकुमार विष्णुपंत शिंदे<br>पितांबर, जे-४, जवाहरनगर हाऊसिंग सोसायटी, जवाहरनगर, कोल्हापूर | संबंधित जिल्ह्यातील मानवहितकारक कार्य करणारे/ प्राणी कल्याणासाठी कार्य करणारे कार्यकर्ते. | अशासकीय सदस्य |
| ७ | श्री. साताप्पा पुंडलिक कांबळे<br>मु.पो.बस्तवडे, ता. कागल, जि.कोल्हापूर | | |
| ८ | श्री. रामदास नामदेवराव देसाई<br>मु.पो.पिंपळगाव खुर्द, ता. कागल, जि.कोल्हापूर | | |
| ९ | श्री. जयवंत संभाजी कांबळे<br>मु.पो.हळदी, ता. कागल, जि.कोल्हापूर | | |
| १० | श्री. सागर भैरु कांबळे<br>मु.पो. बेनिक्रे, ता. कागल, जि.कोल्हापूर | | |
| ११ | श्री. महादेव बसाप्पा आवळेकर<br>मु.पो.मळगे खुर्द, ता. कागल, जि.कोल्हापूर | | |

३. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११७१७३०३२५४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vikas Tulshiram Kadam

Digitally signed by Vikas Tulshiram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, cn=Vikas Tulshiram Kadam
Date: 2019.01.17 17:34:27 +05'30'

**(विकास तु. कदम)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

३. अपर मुख्य सचिव, (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

४. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे-६७.

५. अतिरिक्त आयुक्त, पशुसंवर्धन तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र प्राणी कल्याण मंडळ, पुणे

६. मा. मंत्री (पदुम), यांचे खाजगी सचिव

७. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव

८. महाव्यवस्थापक, देवनार पशुवधगृह, मुंबई.

९. सर्व जिल्हाधिकारी.

१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती)

११. सर्व प्रादेशिक सहआयुक्त, पशुसंवर्धन.

१२. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त

१३. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद.

१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१५. कोल्हापूर जिल्ह्यातील प्राणी क्लेष प्रतिबंधक सोसायटीच्या व्यवस्थापन समितीचे सर्व अशासकीय सदस्य

१६. निवड नस्ती